**<u>शैक्षणिक वर्ष २०२४-२५</u>**
**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अंतर्गत नवीन महाविद्यालयांना मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :** HTED-२९०१०/४/२०२४/८११२०४-MHT-(HE-४)
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १५ जुलै, २०२४.

**<u>संदर्भ:</u>**
१) शासन निर्णय क्र. एनजीसी २०१७/(२२९/१७)/मशि-४, दिनांक १२.१०.२०१७.
२) दिनांक ५.०७.२०२४ रोजी अधिसूचित करण्यात आलेला महाराष्ट्र अधिनियम क्र.XXIV/२०२४, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ (सुधारणा)अधिनियम, २०२४.

**शासन निर्णयः-**

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अधिनियम, १९९७ आणि संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार, राज्यातील कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, नागपूर या विद्यापीठाने शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी नवीन महाविद्यालयांचे प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे मान्यतेसाठी अग्रेषित केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या निकषांप्रमाणे छाननी करण्यात आली. विद्यापीठाची शिफारस आणि शासनस्तरावर केलेल्या छाननीनुसार पात्र ठरलेल्या प्रस्तावांना कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अधिनियम, १९९७ मधील कलम ६२(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या एकूण १८ नवीन महाविद्यालयांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. महाविद्यालयांची मान्यता ही शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कायम विनाअनुदानित तत्वावर राहील. तसेच सदर महाविद्यालयांच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांचे वेतन व वेतनेतर दायित्व शासनावर असणार नाही.

२. महाविद्यालय/संस्थेने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

३. महाविद्यालयांनी, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक/कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र प्रमाणित करून विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयाने/संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय आणि तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय

युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. महाविद्यालयाने सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्या कालमर्यादेत नॅक मुल्यांकन करुन घेण्यासाठी प्रयत्न करावा व याबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

७. विद्यापीठांनी शासन निर्णयाचे अवलोकन केल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

८. संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन, सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास, सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे आदेश विभागीय सहसंचालकांनी काढावेत आणि ते शासन व संबंधित विद्यापीठाकडे पाठवावेत.

२. सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मध्ये सार्वजनिक विद्यापीठांच्या अधिनस्त नवीन महाविद्यालयांना अंतिम मान्यता देण्याची मुदत १५ जून अशी आहे. शासन अधिसूचना दि. ०५.०७.२०२४ अन्वये सार्वजनिक विद्यापीठांतर्गत नवीन महाविद्यालयांना मान्यता देणेबाबतची अंतिम मुदत १५ जुलै पर्यंत वाढविण्यात आली आहे. संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतुदीनुसार कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक अंतर्गत नवीन महाविद्यालयांना अंतिम मान्यता देणेबाबतची अंतिम मुदत १५ जून अशी आहे. सार्वजनिक विद्यापीठांप्रमाणेच कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेकअंतर्गत नवीन महाविद्यालयांना अंतिम मान्यता देण्याची मुदत सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने, १५ जुलै पर्यंत वाढविण्यात आली आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७१५११२४१८७६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.15 23:18:41 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री , उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कुलसचिव, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विश्व विद्यालय, रामटेक.

७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८) सर्व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.

९) संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)

१०) निवड नस्ती (मशि-४).

**शासन निर्णय क्रमांक : HTED-२९०१०/४/२०२४/८११२०४-MHT-(HE-४), दि.१५ जुलै, २०२४ सोबतचे सहपत्र**

**विवरणपत्र-अ**

| अ. क्र. | संस्था / प्रस्तावित महाविद्यालयाचे नाव | प्रस्तावित विद्याशाखा |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **छत्रपती संभाजी नगर विभाग** | |
| १. | विश्वभारती जनसेवा फाउंडेशन,<br>फ्लॅट नं. १०१, चिखलठाना, जि. छत्रपती संभाजीनगर.<br>मंगलदीप महाविद्यालय,<br>गट नं. २२९, बीड रोड, निपाणी, ता. जि. छत्रपती संभाजीनगर. | बी.ए. (योगशास्त्र) |
| २. | विश्वात्मा शिक्षण प्रसारक मंडळ,<br>६०, गल्ली नं. ११, पुंडलिक नगर, छत्रपती संभाजीनगर.<br>ज्योतिर्मय महाविद्यालय,<br>नाळेगाव, ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजीनगर. | बी.ए. (विशारद संस्कृत) |
| ३. | जय लक्ष्मी सांस्कृतिक व शिक्षण संस्था,<br>छत्रपती संभाजीनगर.<br>श्री स्वामी समर्थ सिनियर कॉलेज,<br>शिऊर बंगला, ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजीनगर | १) बी.ए. (किर्तनशास्त्र)<br>२)बी.एससी. (योगिक सायन्स) |
| ४. | सुशील मुरली सातमाळा डोंगरी वैद्यकीय बहुउद्देशीय सेवाभावी संस्था,<br>गोंदेगाव, ता. सोयगाव, जि. छत्रपती संभाजीनगर.<br>डॉ. पी. एम. पाटील वरिष्ठ महाविद्यालय, वनगाव, ता. सोयगाव, जि. छत्रपती संभाजीनगर. | १) बी.एससी. (योगिक सायन्स)<br>२) बी.ए. (योगशास्त्र) |
| ५. | संत तुकडोजी महाराज शिक्षण प्रसारक व सांकृतिक क्रीडा मंडळ,<br>जानेफळ, ता. जाफ्राबाद, जि. जालना.<br>श्री गुरुदेव महाविद्यालय,<br>जानेफळ, ता. जाफ्राबाद, जि. जालना. | बी.ए. (वेदविद्या) |
| ६. | कै. डॉ. सुभाषराव ढाकणे बहूउद्देशीय सेवाभावी संस्था,<br>५९, गुरुप्रसाद निवास, पांगारकरनगर, जालना.<br>माऊली महाविद्यालय,<br>रोहणवाडी, ता. जि. जालना - ४३१२०३. | बी.ए. (योगशास्त्र) |

| अ. क्र. | संस्था / प्रस्तावित महाविद्यालयाचे नाव | प्रस्तावित विद्याशाखा |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| ७. | रघुवंशी चॅरीटेबल ट्रस्ट,<br>तुर्काबाद खराडी, ता. गंगापूर, जि. छत्रपती संभाजीनगर.<br>कृष्णम आर्ट्स अँड सायन्स सिनिअर कॉलेज,<br>गांधेली, ता. जि. छत्रपती संभाजीनगर. | १) बी.ए. (योगशास्त्र)<br>२) बी.एस्सी. (योगिक सायन्स) |
| ८. | विश्वशांती छत्रपती शिवस्मरण ज्योत सामाजिक शैक्षणिक क्रीडा व सांस्कृतिक मंडळ,<br>रांजणगाव, ता. गंगापूर, जि. छत्रपती संभाजीनगर.<br>लेट वेणूबाई बळी पाटील आर्ट्स अँड सायन्स सिनिअर कॉलेज,<br>विटावा, ता. गंगापूर, जि. छत्रपती संभाजीनगर. | १) बी.ए. (योगशास्त्र)<br>२) बी.एससी. (योगिक सायन्स) |
| | **अमरावती विभाग** | |
| ९. | स्व. बॅरिस्टर रामराव देशमुख बहुउद्देशीय शिक्षण व क्रीडा संस्था,<br>निवाना, ता. संग्रामपूर, जि. बुलढाणा - ४४४२०२.<br>सौ. पुष्पाताई विक्रमराव देशमुख महाविद्यालय,<br>कवठळ, ता. संग्रामपूर, जि. बुलढाणा - ४४४२०१. | बी.ए. (योगशास्त्र) |
| १०. | जिवन आनंद हेल्थ फाउंडेशन<br>असोला, ता. चिखली, जि. बुलडाणा.<br>मातोश्री राजलादेवी गुरुकुलम महाविद्यालय,<br>असोला बु., ता. चिखली, जि. बुलडाणा. | १) बी.एससी. (योगा नॅचरोपॅथी अँड डायटेटिक्स)<br>२) बी.ए. (योगशास्त्र) |
| ११. | आदर्श शिक्षण ग्रामीण विकास व बहुउद्देशिय संस्था,<br>वळती, ता. चिखली, जि. बुलढाणा.<br>आदर्श महाविद्यालय,<br>वळती, ता. चिखली, जि. बुलढाणा. | १) बी.ए. (विशारद पाली)<br>२) बी.ए. (योगशास्त्र) |
| १२. | जिजामाता बहुउद्देशीय शिक्षण प्रसारक मंडळ,<br>हिवरा खुर्द, ता. मेहकर, जि. बुलढाणा.<br>जिजामाता महाविद्यालय,<br>हिवरा खुर्द, ता. मेहकर, जि. बुलढाणा. | १)बी.ए. (योगशास्त्र)<br>२) बी.ए. (वेदांग ज्योतिष) |
| १३. | महात्मा फुले शिक्षण क्रीडा व सांस्कृतिक मंडळ,<br>पळशी (बु.) ता. खामगाव, जी. बुलढाणा.<br>स्व. सीताराम नारायण धनोकार सिनिअर कॉलेज,<br>पळशी (बु.) ता. खामगाव, जि. बुलढाणा. | १) बी.ए. (योगशास्त्र) |
| १४. | श्री शामकी माता शिक्षण, कला, क्रीडा व आरोग्य बहुउद्देशीय संस्था, | १) बी.ए. (योगशास्त्र)<br>२) बी.एससी. (योगिक सायन्स) |

| अ. क्र. | संस्था / प्रस्तावित महाविद्यालयाचे नाव | प्रस्तावित विद्याशाखा |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | खडकी, ता. जि. अकोला.<br>स्वामी विवेकानंद कला व विज्ञान महाविद्यालय, उमरी खुर्द, ता. मानोरा, जि. वाशिम. | |
| | **नांदेड विभाग** | |
| १५. | तनवी बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, औंढा (ना.), जि. हिंगोली.<br>श्री निळकंठेश्वर वरिष्ठ महाविद्यालय, आडगाव (खं.), ता. जितुर, जि. परभणी. | १) बी.ए. (योगशास्त्र) |
| १६. | श्री निळकंठेश्वर बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, मोहखेड, ता. जिंतूर, जि. परभणी.<br>श्री निळकंठेश्वर महाविद्यालय, सेंदूरसना, ता. औंढा (ना.), जि. हिंगोली. | १)बी.ए. (योगशास्त्र) |
| | **पुणे विभाग** | |
| १७. | इंडियन टेक्निकल अँड कॉम्पुटर इन्स्टीट्यूट, काळभोर नगर, चिंचवड, पुणे-१९.<br>योगार्थी स्कूल ऑफ इंडिक स्टडीज, आकुर्डी, ता. हवेली, जि. पुणे - ४११०३५. | बी.ए. (योगशास्त्र) |
| | **पनवेल विभाग** | |
| १८. | तेरणा पब्लिक चॅरीटेबल ट्रस्ट, तेरणा मेडिकल कॉलेज, पहिला माळा, सेक्टर-१२, नेरूळ, जि. ठाणे - ४००७०६.<br>तेरणा पद्मयोग साधना कॉलेज, तेरणा विद्यालय कॅम्पस, सेक्टर-१२, नेरूळ, जि. ठाणे - . | बी.एससी. (योगा नॅचरोपॅथी अँड डायटेटिक्स) |

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.07.15 23:19:04 +05'30'

(अशोक मांडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन